# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 11 सुब्बय्या श्रेष्ठी, चिंतामणि - बिल्वमंगल वृत्तांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |
| अध्याय ११, पान ८६. कथानक<br>1. शंकर भट्टांना दुसऱ्या दिवशी सकाळी दत्त आराधनांचे महत्त्व, फळ श्रींचे अति अदभूत ज्योतिर्मय दर्शन सांगतात. विवाह चंद्र शेखर रामकृष्ण अवधानींशी मल्लादि गावात झाला. त्यांच्या नंतर जन्मलेल्या श्री विद्याधरी, राधा आणि सुरेखा नामक तीन बहिणींचे पूर्वकथन आणि नंतरच्या काळातील सहभाग सांगतात. गोदावरी मंडलात ताटकपूर (तणुकू) गावात माधवाचारी आणि सायणाचार्य विद्वान बंधुद्वय होते. माधवाचारींचे पुढील रूप विद्यारण्य स्वामी हे श्रींचे समकालीन व अनुग्रहित झाले. तेच नंतरच्या काळात तंजावूरचे महामंत्री होतील असे श्रींनी अन्यत्र म्हटले आहे. विवाह विश्वनाथ मुरलीकृष्ण अवधानींशी विजयवाडाला झाला. ताडेपल्ली दत्तात्रय अवधानींशी मंगलगिरीला झाला. | <br>२. एकदा बापन्नाचार्यांनी घरातील कालाग्निशमन मूर्तीची पूजा करताना पाहून श्रींना विचारले, ' बेटा, तू |

दत्त की दत्त उपासक?'

दोन्ही मीच अजोबा, पुढच्या जन्मात मी तुमचे हुबेहुब रूप धारण करून अवतरणार आहे.

पीठिकापुरात सावितृकाष्ठक नामक यज्ञ त्रेतायुगात भारद्वाज ऋषींनी केला होता. त्याचे फळ म्हणजे माझ्या पादुकांची स्थापना बापन्नाचार्य यांच्या घरी होईल. नंतरच्या काळात श्रीधर (स्वामींच्या प्रयत्नातून) माझी प्रतिष्ठापना आणि प्रसिद्धी होईल.

३.पुढे एकदा नरसिंह वर्मांच्या शेतात फिरायला गेले असता आजोबांना म्हणाले, 'तुम्हाला नरसिंह स्वामींचे दर्शन हवे का? 'काही चेंचू (आदिवासी) युवक युवतींना पहात श्रींनी म्हटले,' नृसिंह अवताराशी हे संबंधित आहेत. श्रींनी त्यांना म्हटले, तुम्ही नृसिंह देवाला पाहिले आहे? हो का नाही? श्रींना वंदन करून नृसिंह वर्मांना फेर धरून त्यांनी म्हटले, 'आमची देवता चेंचूलक्ष्मी आणि नृसिंह देवाने विवाह केला आहे ते आपल्या समोर येतील... मी, सुब्बय्या श्रेष्ठीं, योगायोगाने तिथे पोहोचलो.

अशी बोलचाल होताना मला जवळ बोलावून, समोर काटक्या एकत्र करून जाळ करत म्हणाले, ते दोन कोण आहेत ते ओळख. ते दोघे कोण याची खात्री मला पटली. ते दोन म्हणजे ती वेश्या चिंतामणी आणि तो मल्याळी मित्र बिल्व मंगल होते.

त्या दोघांनी म्हटले, आम्ही गुरूवायूरच्या मंदिरात श्रीकृष्ण दर्शन घ्यायला गेलो असताना कुरूरअम्मा या नावाच्या महायोगिनींचा आशीर्वाद घेऊन मंगलगिरीच्या मंदिरात नृसिंग देवाचे दर्शन घेऊन

४. पीठिकापुरातील श्रींच्या दर्शना जायची आज्ञा झाली.

म्हणून आम्ही इथे आलो आहोत. पाहता पाहतासमोरच्या आगीत शरीराचा दाह असह्य झाला.दोन काळ्या आकृती शरीरातूनबाहेर पडून खाक झाल्या.



चेंचुलक्ष्मीची मुर्ती
चित्राडा मधे महालक्ष्मी मंदिर

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

तितक्यात हात बांधलेल्या स्थितीत एका तरुणाला चंचू लोकांनी नृसिंह देवाच्या झालेल्या तरुणाला व चेंचु लक्ष्मी जालेल्या तरुणीला श्रींच्या समोर उभे केले अन तूच नृसिह देव आहेस का असे तीन वेळा विचारले. हो तो मीच, म्हटल्यावर नरसिंहवर्मांची बोबडीच वळली! असा प्रकारे झालेला तो अनाकलनीय चमत्कार होता. मग ते दोघे, चेंचू अदिवासी, श्रींच्या श रीरात समाविष्ट होऊन गुप्त झाले. बिल्व मंगल पुढे एक महर्षी झाला तर चिंतामणी एक महायोगिनी झाली. या नंतर नरसिंह वर्मांच्या जागेचे नाव पुढे चित्रावाडा (सध्याचे चित्राडा) असे पडले.



# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता




चेंचुलक्ष्मी संग्रहालय

अध्याय ११ समाप्त

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 12 कुळशेखर वृत्तांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय १२ , पान ९२. कथाभाग<br>१. कुरवपुराच्या वाटेवर सुब्बय्या श्रेष्ठींनी शंकर भट्ट यांना श्रींच्या बालपणातील सुरस लीलानुभव कथन करताना जणूकाही प्रत्यक्ष श्रींच्या मुखातून वक्तव्य होत असल्याचा आभास होत होता. श्रींच्या लीला चरित्र लिहून झाल्यावर ते वाचन केल्यानंतर ११ सत्पुरुषांना जेवण द्यायला हवे किंवा त्यांच्या भोजनाच्या खर्चाइतकी रक्कम दत्त क्षेत्रात दान करायला त्यांनी सुचवले आहे.<br>एकदा मल्याळम देशाचा एक कुलशेखर नामक मल्ल गावोगावी अनेक मल्लांना हरवत पीठिकापुरात पोहोचला. आता तेथील मल्लांना मार खाऊन फजिती व्हायची वेळ आली. काहींनी<br>३. श्रींचे स्मरण केले. श्रींच्या सांगण्यावरून कुस्ती करायला कोण सामोरे येणार याची उत्सुकता<br>त्यावर श्रींनी त्याला म्हटले, 'तू ज्या सप्तगिरी बालाजीला मानतोस तो मीच आहे. अहंकाराने फुगला आहेस. यापुढे तुला अन्नवस्त्राची कमी पडणार नाही. मात्र यापुढे तुला भीमाची दुर्बलता तुला देतो. सुदाम्याला जसे श्रीकृष्णाने त्याच्या पुर्वकर्मातील पापाचरणाची फेडणी करून कर्मसूत्र किती गूढतेने आणि सूक्ष्मतेने घडवते. तसेच श्रींनी भीम आणि कुलशेखर मल्लयुद्धातून दर्शवून दिले. | २. होती. पहातात तर एक काडी पहिलवान भीम नावाच्या कुबड्याला श्रींनी आखाड्यात उतरवला. तो श्रींना, 'मला बरे करा' म्हणून मागे लागत असे. 'वेळ आली की करीन' असे दिलेल्या वचनानुसार कुक्कुटेश्वर मंदिर प्रांगणात मल्लयुद्ध सुरू झाले. कुलशेखर भीमाला बदडून घायाळ करू पहात होता. पण ते कुबड्याला मर्मस्थानांवर ते आघात वरदान ठरून तो एकाएकी बलवान होत गेला. शेवटी कुलशेखर थकून गेला व हार मानून बसला.<br>४.कुकुटेश्वराच्या मंदिर प्रांगणात ही कुस्ती झाली. त्या भागाचे काल्पनिक दृश्य |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 13 आनंद शर्मा वृत्तांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे?<br>कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |
| अध्याय १३,पान १५ श्रींचे वय ६ वर्षे कथाभाग<br>1. आनंद शर्मा हे तेजस्वी ब्राह्मण शंकर भट्टांना ते सुब्बय्या श्रेष्ठींचा निरोप घेऊन कुरवपुराकडे जाताना वाटेत सहजपणे गाठ पडली. मात्र शंकर भट्ट नामक दत्त भक्त येईल त्याला जेऊ घाल आणि पुढील वाटचालीसाठी मार्ग दर्शन कर.<br>पुढील चर्चेत आनंद शर्मा त्यांच्या बालपणी वडिलांबरोबर पेंचललकोन म्हणजे बृहदशीलाकोन या गावातील नृसिंह देवाच्या मंदिरातून एका वृद्ध यतिंनी ध्यान मार्गाने कण्व मुनिंचे दर्शन घडवले.<br>कण्व मुनींद्रांनी म्हटले की दत्त प्रभू सध्या पीठिकापुरात श्रीपादश्रीवल्लभ रूपात आहेत.<br>आनंद शर्मा पुढे म्हणतात, 'श्रींच्या दर्शनासाठी ओढ लागली. वडिलांनी त्यांना राजमहेंद्रीला नेले. जवळपास गोदावरीच्या पात्र बेटात पट्टसांचल क्षेत्रात ध्यानाला येत. तेथून मुनिकूट क्षेत्रात विविध विषयांवर चर्चा व विश्रांतीला येत. हे एदुरूपल्ली गावाजवळ आहे. मी वडिलांसोबत हे पहात पीठिकापुरात आलो. श्रींचे दर्शन पावून धन्य झालो. तेंव्हा श्रींचे वय अवघे ५ वर्षे होते. | <br>पेंचलकोन मोठ्या शिळा असलेले नगर... |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

२. यानंतर शंकर भट्टांनी आनंद शर्मांकडून गायत्री मंत्र महिमा समजून घेतला. शिवाय श्रींच्या नंतरच्या अवतारात नृसिंह सरस्वतींच्या गुरूंची पूर्वपीठिका समजून घेतली. ते म्हणाले, ‘मायणाचार्य आणि पत्नी श्रीमनी यांना तणकू (ताटंकपुर) ला असताना माधव, सायणाचार्य, भोगीनाथ अशी मुले होती. त्यातील माधव पुढे विद्यारण्य स्वामी झाले. नंतर तेच कृष्ण सरस्वती नावाने नृसिंहांचे गुरू होतील. सायण हे गोविंद दीक्षित नावाने तंजावूरच्या राजांचे महामंत्री होतील. वंश परंपरेने मल्लादि व वाजपेयी घराण्यात नातेसंबंध होते.
आनंद शर्मा आणखी चकित करणारी माहिती देताना सांगितले की श्री स्त्री रूपातही अवतरित होतात. शंकर भट्टा तू श्रींचे चरित्र लिहिशील.
एकदा ज्योतिषाचे गर्वहरण करायला वेंकटपैय्या श्रेष्ठीचा अपमृत्यू बैलाचा मृत्यू घडवून टाळला. नंतर शंकर भट्ट आनंद शर्मांचा निरोप घेऊन कुरवपुराकडे निघाले....

मुनीकूडल - राजमहेंद्री जवळ




अध्याय १३ समाप्त

.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 14 दत्तदासाला अभय प्रदान

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे?<br>कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |
| अध्याय १४, पान 10६. कथाभाग<br>1.शंकर भट्ट पुढे 'मुंतकल्ल' गावात पोचले. तिथून काही अंतरावर कुरवपूर असल्याचे ऐकून आनंदित झाले. एका ताडीविक्या ब्राह्मणाने त्यांच्यावर ताडीपिण्याचा आळ आणून शंकर भट्टांना ताडीपाजून खूप तमाशा केला. | २.मुंतकल्ल गाव सापडत नाही. पण सध्याचे ताडीपत्री गाव ताडी व्यवसायासाठी प्रसिद्ध आहे. यावर आणखी शोध कार्या अपेक्षित. |
| वैतागून जाताना एका दत्तदास नामक आश्रमवासीने ताडीपिण्याचा शंकर भट्टांची पूर्वजन्मातील अपुरी इच्छा पूर्ण केली. म्हणून तू पश्चाताप करू नकोस. उपनयन संस्कार श्रींच्या आठव्या वर्षी थाटात साजरे झाले. पण दत्तदासाला, मालदास आदि पंचम नामक अंत्यज असल्याने तो सोहळा पाहता आला नाही. म्हणून दत्तदास दत्तचरित्र ५३ वेळा तेच तेच सांगत राहिले. म्हणून तुझ्या हातून लिहिला जाणाऱ्या श्रीपादवल्लभ चरितामृतात ५३ अध्याय असतील. अशारितीने शंकर भट्टांच्या मनातून वर्ण, जाती, कुलगोत्र अशा भौतिक जळमटांना श्रींच्या समोर काहीही मान्यता नाही हे बिंबवले. पुढे दत्त दासांचा निरोप घेऊन कुरवपुराकडे निघाले.<br>अध्याय १४ संपूर्ण.... | <br>ताडीपत्री गाव |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 15 बंगारप्पा व सुंदरम शर्मा वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय १५, पान ११४. कथाभाग<br>1.शंकर भट्ट प्रवासात पाणी पिण्यासाठी बालटी व दोर घेऊन विहिरीत डोकावून पाहिले तर तिथे एका उगवलेल्या झाडाला एकजण लटकलेले पाहिले. त्याला कसे बाहेर काढावे असा विचार करत असताना तो आपल्याआपण लीलया चढून वर आला.<br>म्हणाला, 'शंकर भट्टा, मी तुझी वाटच बघत आहे. तू श्रीपादश्रीवल्लभांच्या दर्शनासाठी कुरूगड्डीला निघाला आहेस.'मी बंगारप्पा. पाणी मी पिवून तुझी तहान भागवणार आहे! आता पहा '. ते ऐकून चकीत झालेल्या शंकरांची तहान पाणी न पिताच भागत होती, अन विहिरीतून पाणी काढून बंगारप्पा ते गटागटा पित होता! घडले तो चमत्कार होता! बंगारप्पा म्हणाला, शंकर<br>भट्टा तू प्रापंचिक संसारजाळात अडकलेला आहेस. जसा तू मला विहिरीत अडकलेल्या अवस्थेत पाहिलास. पण मी योगायोगाने बंधन मुक्त आहे. तू काय मला बाहेर काढणार? माझा मीच बाहेर येऊ शकतो. ती शक्ती श्रीपादवल्लभ पुरवतात.<br>दोघेही प्रवासात चालताना कळले की बंगारप्पा जन्माने सोनार जातीचा. पण तंत्र मंत्र विद्या शिकायला स्मशानात राहायचो. पारंगत झाल्यावर चेहरा भेसूर आणि स्वभाव क्रूर बनला. | २.श्रीपाद आणि त्यांचे आजोबा बापन्नाचार्य यांच्यावर काळ्या विद्येच्या प्रभावाने मारून टाकायच्या इराद्याने मी पीठिकापुरात गेलो. अनेक प्रकाराने पछाडायचा प्रयत्न केला पण अपयश आले. उलटलेल्या प्रयोगामुळे मी रोगग्रस्त झालो. श्रींच्या कृपेने क्षुद्र विद्या नष्ट झाल्या.<br>म्हणतात पूर्वजन्मातील पुण्यकर्म एकाच वेळी फलद्रूप जेव्हा होते त्याला नशीब म्हणतात. तसेच पाप एकाच वेळी फलद्रूप होते, त्याला दुर्दैव म्हणतात. तरीही तू तहानलेल्या अवस्थेतये येऊन भेटत नव्हतास तोवर माझ्या पापाचे समूळ उच्चाटन होणार नव्हते! ते आज झाले म्हणून मी फार आनंदी आहे. असो. पुढील यात्रेतून साधन मार्गातील सप्त भूमिका, अवतारी पुरूष आणि साधक यातील फरक, सत्कर्म दुष्कर्म फलिताचे विवेचन ऐकले, एकदा वेलप्रभू नामक पीठापूर राजांना श्रीपादवल्लभांचे व्यक्तीमत्व मान्य होत नव्हते. त्यांचे गर्वहरण श्रींनी केले. त्यातून श्री कसे हुशारीने समस्या निर्माण करून चतुराईने निराकरण कसे करतात याचे कथन ऐकायला मिळाले. |

३.पुढच्या अवतारात गंधर्व नगरात(गाणगापुर) झपाटलेल्या भक्तांची भूतप्रेतांपासून सुटका करीन असे आश्वासन दिले आहे....

सध्या गाणगापुरात अशा पीडित लोकाची गर्दी असते आणि या विकारातून सुटका होत असते.

अध्याय १५ समाप्त.




।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 16 श्रीमन्नारायण वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| **अध्याय १६, पान १२२. कथाभाग श्रींचे वय ८ वर्षे होते.**<br>1. शंकर भट्ट कुरवपुरात लवकरच जाणार या आनंदात कुंभार कुटुंबातील श्रीमन्मारायण मल्लादिंच्याहातून उसाचा रस पिताना समजले की ते श्रीपादवल्लभ ८ वर्षांचे होते त्या काळात मल्याद्रिपुर सोडून पीठिकापुरात राहात होते.<br>पण श्री बापन्नाचार्यांनी तिथून पश्चिम दिशेला जाऊन उडदाच्या पिकातून उपजीविका करायला सांगितले तसे कर्नाटकात एका शेतकऱ्यांच्या आश्रयाला आलो. त्यांच्या शेतात मिरच्या पिकाला चोरायला त्यांचे भाऊबंद धावून आले. तेंव्हा अचानक एक अस्वल माझ्या सोबत वाचवायला आले. नंतर ते अस्वल माणसाळल्याप्रमाणे राहू लागले. श्रीपादश्रीवल्लभांच्या दयार्द्र दृष्टीने उपकृत व्हायला दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा हा नामोच्चार करावा. हे ऐकून दृढ भक्ति भावाने शंकर भट्ट कुरवपुराला उत्साहित होऊन निघाले. | २.रस पिताना ते अस्वल शंकर भट्टांना दिसले. ते घाबरले. अस्वलाने मानवी वाणीने पूर्वकर्म बोलून आपला प्राण सोडला. त्याचे दहन करताना नाग कोठूनसे आले. आणि सोबतच राहून वृद्ध दांपती शेतकऱ्यांना रक्षण करू लागले. एकदा एक वृद्ध दाम्पत्याला मारायला क आला. त्याने अस्वलाला निपचित केले. पण श्रीपादवल्लभांचे नामस्मरण केल्याने तो मांत्रिक वेडा होऊन त्याच्या सहकाऱ्यांसह जंगलात पळून गेला. त्या दाम्पत्यांचे शेत गावकऱ्यांनी मल्लादिंच्याहातून कुंभाराला नावे करून दिले. सर्व अतर्क्य कथन एकूण शंकर भट्ट चक्रावलेला.<br>अध्याय १६ समाप्त... |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 17 श्रीनामानंदांचे दर्शन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 17, पान 129. कथाभाग.<br>1 धटिंगण एका स्त्रीला मागे लागून त्रास देताना श्री नामानंदंच्या आश्रमांत शंकर भट्ट चर्चा करातात. कुरवपुराच्या वाटेवर शंकर भट्टांसमोर अचानक घाबरलेल्या अवस्थेत एक बाई समोर आली. तिच्या मागे दोन अडदांड धटिंगण तिला धरून न्यायला आले. शंकर भट्टांनी तिला दिलासा दिला. 'ए काटकुळ्या बामणा तिला सोड. म्हणून धावून आले. | पण कसे काय माहीत नाही, भट्टांनी जे बोल सुनावले ते ऐकून ते सरळ पाया पडले! म्हणाले, 'आम्ही जन्माने ब्राह्मण पण मदिरा पान आणि कुकर्म करत होतो. या बाईला ध्यान करताना पाहिले. तिच्यावर बलात्कार करायला मागे लागले. आम्हाला पश्चाताप झाला आहे. अध्याय 17 समाप्त. |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 18 श्रीपादांचे दिव्य दर्शन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय १८, पान १२८ कथानक<br>1.श्रींचे प्रथम दर्शन शंकर भट्टांनी श्री कृष्णानदीच्या पात्रातून स्नान करून येताना झाले. त्यांच्या दिव्य मंगल मुखातून म्हटले, 'बेटा माझ्या वरच्या दिव्य प्रेमाने तुला इथे आकर्षित केले'. असे म्हणून त्यांच्या मस्तकावर हात ठेवताच कुंडलिनी शक्ति जागृत होऊन समोरचे विश्व अदृष्य झाले. मन निर्विकार, निश्चल होऊन शून्यात गेले. त्या कल्पनातीत आनंदात असताना कमंडलूतील पाण्याने प्रोक्षण केल्यावर शंकर भट्टांना आपले भान परत आल्याचे जाणवले. दोघांकडे पाहात असता भट्ट म्हणाले, हे ब्राह्मण आपल्या दर्शनासाठी आले आहेत.'<br>' अरे हे तर यवन आहेत. माझे दर्शन लाभले पण चरणस्पर्ष मिळणार नाही. तुमच्या हातून मारल्या गेलेल्या गाई संता रूपाने येऊन तुमचा अनेक रूपाने छळ करतील. काही शतकानंतर माझ्या दर्शन भाग्यामुळे शीलाधी (शिर्डी) येथे अवतरेन तेव्हा तुम्ही बड़े बाबा आणि अब्दुलबाबा म्हणून प्रसिद्ध व्हाल. | <br>अव्दुलवाबा शिरडी साईंचे एक भक्त |
| २.तेंव्हा आता तुम्ही निघा. त्या प्रमाणे ते निघून गेले. इकडे माझ्याकडे पहात श्रीपादांनी त्यांच्या भ्रूमध्यात अंगठ्याने दाबले. अदभूततेचा आनंद होत त्यांच्या अंकचक्षूंसमोर कृष्णा नदीच्या पात्रात रविदास नावेतून एका वेदशास्त्र संपन्न पंडिताला जाताना पाहिले. | ३.नंतर तो रविदास तिथल्या तिथे मरण पावला. हे सर्व माझ्या कपाळावर स्पर्शाने घडले यावर ते संभ्रमित होऊन गेले. व सावध झाले तेंव्हा अनेक भक्त गणांनी दर्शनासाठी गर्दी केल्याचे जाणवले. त्या सर्वांना हळकुंडाचा प्रसाद देऊन श्री तेथून निघून गेले. |

तो जास्त पैसे घेऊन जात होता. एकदम नाव बुडायला लागली. आपला जीव वाचवायला रविदास नदीत उडी टाकणार इतक्यात ती नाव पुन्हा तरली. काठावर आल्यावर श्रीपादवल्लभांसमोर ते आले तेंव्हा त्या पंडिताला म्हणाले, ‘अरे तू एका रजक स्त्रीला रखेल ठेवून आहेस. पुढील जन्मी ती राजैश्वर्य भोगेल आणि तू तिची नपुंसक होऊन सेवा करशील. या रजकामुळे तुझे प्राण वाचले. आत्ताच्या आत्ता तू जा. तो पंडित निघून गेलेला पाहिला. नंतर भट्टांना नावाडी रविदास कपडे घुवत असताना काही स्त्रियांसमावेत राजा क्रीडा करताना पाहात असल्याचे दिसले. तेव्हा श्रींचे नमन करून मला असे सौख्य प्राप्त होईल का? असे विचारताना दिसले. श्रींच्या वाणीतून, तू यवनवंशात विदुरा नगरीत जन्म घेशील. तेंव्हा माझ्या नरसिंह सरस्वती अवतारात माझे दर्शन घेशील' असे म्हणत असल्याचे तरळले.



रविदास विदरला जन्मून राजा झाला. नंतर नरसिंह सरस्वतींच्या अवतारात पुन्हा भेटीला आला.

३. तेवढ्यात पीठापूरहून आलेल्या वल्लभेषाला श्रीपादांनी अक्षय्य पात्र देऊन अनुग्रह केला. एका कानडी सुब्बण्णा शास्त्रीना ते म्हणाले, 'तुम्ही या वल्लभेषाच्या विवाहाचे पुरोहित्य करावे. तेवढ्यात एक गरीब ब्राह्मण नमस्कार करत असता ते त्याला म्हणाले, 'तू तुझी मुलगी या वल्लभेष ब्राह्मण तरुणाला दे'!

----

४.हे सर्व होत असताना अचानक घंटानाद ऐकू आला. आणि होता होता एक घंटा श्रीपादांच्या पायाशी पोचली आणि काही वेळाने अदृश्य झाली!

------



श्रीपादांनी आवडत्या शिळेवर बसून केले आदेश

५.शंकर भट्टांना श्रीपादांचे दर्शन झाल्यावर नंतरच्या दिवसातील या कथनात श्रीपादांचे विराट स्वरूप त्यांच्यासह कुरवपुर आत जमलेल्या शिष्यगणांना सांगताना श्रीपाद म्हणाले, "माझ्याबाबतीत कारणाविना कार्य होत नाही. सृष्टी विधान चित्रविचित्र असते. मी निराकारी पण निराकारात तुमचे समोर हे विचित्र! निर्गुण असून सगुण होऊन दर्शन देतो हे ही विचित्र. कालातीत असलो तरी काही काळ तुम्ही माझा अनुभव घेता. ही पण विचित्रच गोष्ट. सर्व शक्ती माझा हातात असतात. या अनंत कोटी ब्रम्हांडातील प्रत्येक अणुरेणूत असणारा मीच. अणु रेणूला जोडणारा संकल्परूपी मीच. अणु अणूला वेगळे करून नवीन सृष्टिरचना करणाराही मीच! आर्त होऊन जीवाने हाक मारताच सहस्रबाहूंनी त्याची रक्षा करणारा अनादि तत्व मीच. त्याला संभाळून त्याची रक्षा करणारे

६. थोडक्यात या अध्यायातील कथानकात गरीब वल्लभाचे इतरांसमावेत शंकर भट्टांना ध्यानावस्थेत नेऊन त्यांना वल्लभाच्या याच जीवनातील पुढील घटनांचा तर रजक रविदासाच्या बाबतीत त्यांच्या पुढील जन्मातील घटनांची झलक दृष्टांताने दाखवली आहे. हे या अध्यायाचे वैशिष्ठ्य आहे.

अध्याय १८ समाप्त

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| अनादि तत्त्व मी मीच. सर्व जीवनात असलेल्या "मी"चा विचार करणारा"मी", पण मीच खरा आहे. अशा माझ्यात सर्व शक्ती त्व सर्वज्ञ त्व सर्वातमयामित्व नसते तर आश्चर्य वाटायला पाहिजे. आता ते व्यक्त रूपे अनुभवाला येत असतांना आश्चर्य कसले? " संदर्भ -  लीला चरितामृत | |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 19 भक्त गुरुचरणाची भेट

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय १९ पान १४५. कथाभाग<br>1.वल्लभेश, त्याची पत्नी, शंकर भट्ट आणि सुब्बण्णा शास्त्री एकत्र जमून श्रीपादांच्या लीला एकमेकांशी कथन करत असताना<br>त्यांचे दूरचे बंधू लिंगण्णाशास्त्री भेटायला आले. तेंव्हा ते आपल्याला आलेल्या अनुभवांचा कथन करताना<br>मी एकदा पितृ तर्पणासाठी पादगया क्षेत्रात गेलो. माझ्या आजोबांनी पूर्वी केलेल्या लोकांच्या तर्पण विधीत कंजुषीच्या लोभाने माझ्या जीवनात किया गया अचानक अभद्र घडू लागले. पत्नी रागावली. माहेरी गेली. मुलाने गळा दाबून मारायचा प्रयत्न केला. सुनेने घराबाहेर काढले. माझी भूक अत्यंत वाढली. भोजनासाठी हीन कामे करून मिळेल ते अन्न खाऊ लागलो. एकदा गोठ्यात काम करत असताना पेज पिण्याची वेळ आली, तेंव्हा एका बाल अवधूतचे दर्शन झाले. त्यांच्या चरणावर पडून मी रडू लागलो. तेंव्हा अवधूताने काही गोड शिरा स्वतः खाऊन बाकीचा मला खायला दिला. तो खाऊन झाल्यावर ती पहार उचल आणि तिथे खण असे सुचवले. त्यावेळी त्या खड्ड्यातून दोन कुत्र्याचे सापळे काढले. भाताची उरलेली पेज खड्ड्यात टाकायला सांगितली तेव्हा ते अवधूत म्हणाले, 'तुझी पिशाच्च बाधा नाहीशी झाली. तू पीठापूरला जायला नीघ. आपण तिथेच भेटू'. म्हणून ते | <br>पाद गया मंदिर पीठापुरम परिसर |

| | |
|---|---|
| अंतर्धान पावले. | |
| २.मी निघालो. वाटेत एक वेदांती गणपतीशास्त्री भेटला. तो बृहतशीला नगर विभागाचे पेनुगोंडा इथून वायसपूरला (काकीनाडा) जात होता. वाटेत त्याला एक दहा वर्षाचा गुराखी बालक म्हणताना दिसला कि' मी मीच आहे. माझ्यात सर्व तत्त्व आहे. ... असलेल्या मला तू काय म्हणून समजून घेणार? इतक्यात एक दहा वर्षाची बालिका आली. ते आपापसात खेळत होते. हे सगळे होत असताना वेंकटपय्या टांग्यातून उतरले. त्यांच्याबरोबर श्रीपादही उतरले. आधी भेटलेला तो शेतकरी, बालक आणि श्रीपाद एकच आहेत हे गणपती शास्त्रींच्या लक्षात आले. बघता बघता तो गुराखी आणि ती बालिका विलीन झाले. त्यांना अशी अनुभूती आली, | <br>पेनुगोंडा ते काकीनाडा (वायसपुर) |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

३.श्री म्हणतायत की मुसलमानांचा सगुण निराकारी 'अल्लाह',  क्राइस्ट लोकांचा सगुण 'यहोवा' अश्या विविध नावाने मी, श्रीपादवल्लभ जगात संचार करीत असतो. जो प्राचीन काळी अत्री - अनुसूयानंदन श्रीपादश्रीवल्लभ आहे, भरद्वाज ऋषींनी दिलेल्या वचनानुसार पीठिकापुरात त्यांनी अवतार घेतलेला आहे. ते म्हणतायत, या घंटेची, माझ्या मूर्तीची स्थापना होईल ते पीठिकापूर कित्येक वर्षानी संस्थान बनेल.

**Transliteration of Yeshua Into Jesus**

| | | |
|---|---|---|
| Hebrew/Aramaic | Ye-sh-ua | (yay-shoo-ah) |
| Greek | Ie-s-ous | (ee-ay-sous) |
| Latin | Ie-s-us | (ee-ay-sous) |
| English | Je-s-us | (gee-sus) |

यिशूह हिब्रूत, ईशस ग्रीक मधे, ईयशस लॅटिन मधे, असे विविध भाषात व वोली भाषेत झालेले बदल.

४.त्या कार्यात सहायता करायला कर्नाटक राज्यातील माणिक प्रभूंच्या वंशातील व्यक्तींकडून मदत होईल. अविश्वासी, मूर्ख, पांडित्य जे प्रत्येक गोष्टीसाठी प्रमाण, पुरावा मागत असतात त्यांना हा सूर्य आहे हे सांगण्यासाठी दुसरे काय प्रमाण देणार?

अरबी में "अल" का प्रयोग होता है, इस प्रकार "*अल्लाह*" का *अर्थ* होता है "एकमात्र उपास्य ईश्वर"
अल्ल का एक अर्थ होता है शिव, अह का अर्थ होता है मात्र वही* संदर्भ – गणेशविद्या पुरात्वकार ल.वि.वाकणकर,




५.श्रींनी वरील आमचे सर्व कथन जणू काही ऐकलेलेच आहे असा भास दुसरे दिवशी सकाळी ते दर्शनाला आल्यावर 'वा! काय चर्चा झाली? श्रीपाद श्रीवल्लभ महासंस्थान व्हायला पुष्कळ वर्षे लागणार ना?' असे विचारल्यावर झाला!...

अध्याय १९ समाप्त.



कुरवपुरातील श्रीपादांच्या पादुकांचे मंदीर

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 20 विश्वावधानींचा वृत्तांत व श्रींचे मंगल स्वरूप

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय २०, पान १५२. कथाभाग<br>1.शंकर भट्ट श्रींच्या दर्शनासाठी कृष्णा नदी ओलांडून कुरवपूरला आले. तिथे त्यांची भेट गुरुचरण यांच्याशी होते. त्यांचे विविध अनुभव ऐकत असताना पुढील काही अध्यायांची निर्मिती होते.<br>श्रींनी शंकर भट्टांना समोर बसवून सगुण साकार रूपात (दत्ताचे?) दर्शन दिले. त्यावेळी एक काळी प्रतिमा शंकर भट्टांचे शरीर सोडून गेली. श्रींनी आपल्या सामर्थ्याने दिव्याग्नी उत्पन्न करून ती काळी प्रतिमा जाळून टाकली. त्यानंतर शंकर भट्टांची | २. कुंडलिनी जागृत झाल्याचा अनुभव समाधिस्त होऊन घेतला. त्यावेळी गुरुचरण नामक एक शिष्य शिष्य भेटायला आला.. नंतर श्रींनी उत्तर भारतात मिळणारी त्यांच्या आवडीची एक मिठाई एका चांदीच्या पात्रात उत्पन्न केली. ती मिठाई बालपणात त्यांना वेंकट श्रेष्ठींच्या माता सुब्बम्मा आपल्या हाताने भरवत असत. ती मिठाई सर्वांनी खाल्ल्यावर काही भाग कृष्णा नदीत सोडून ते पात्रही गुरूचरणांनी नदीस अर्पण केले. |
| ३. शंकर भट्टानी गुरूचरणांना आपल्याला श्री चे दर्शन कसे लाभले ते सांगा म्हणून आग्रह केला. ते म्हणाले, 'मी एका देवभक्त कुटुंबात जन्मलो. बालपणात मला एक स्वप्न पडले. त्यात एक खाटीक बकऱ्याला बळी देत असताना पाहिले. त्या खाटकाने 'मी दत्त'. मी कुठल्याही रुपाने शकतो कुठल्याही दैवी दैवतांची पूजा केली तरी आज पोहोचेल कारण ते माझेच स्वरूप आहे'. असे म्हणून | ४.पुढे मी मोठा होऊन व्यापारासाठी फिरता फिरता पीठापूरला पोहोचलो. तेंव्हा श्रीपाद बापन्नार्य यांच्याबरोबर अंगणात खेळत होते. ज्या एका काटेरी झाडाला प्रेमाने पाणी देत त्याची खूप निगा राखत. हे झाड म्हणजे पूर्वजन्मीचे विश्वावधानी नामक आजोबा आहेत. जे घरच्या सगळ्या लोकांना टाकून बोलत. त्यांच्या काटेरी बोलण्याच्या स्वभावामुळे ते काटेरी |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| माझे मन प्रगल्भ केले. त्याकाळी एक भक्त हरिदास देखील मला भेटून गेला. त्यांनीही मला औदुंबर वृक्षाचे महत्त्व सांगितले. | झाड म्हणून जन्मले. तेवढ्यात मला म्हणजे गुरुचरणला बोलवून श्रींनी ते झाड मुळासकट उपटून जाळून टाकायला सांगितले. या तऱ्हेने काटेरी झाडाला सुद्धा सद्गती मिळू शकते? मी विचारले. |
| ५. यावर श्रींनी उत्तर दिले, 'मी भूत भविष्य व वर्तमान एकाचवेळी अनुभवत असतो. समस्त सृष्टीक्रम उदित व्हावा, असा माझा महासंकल्प असल्यामुळे आदिशक्तीला सृष्टिरचना कशी असावी ह्याचे प्रबोधन करणारी शक्ती म्हणजे मी. या माझ्या संकल्प स्वरूपाचा संकल्प लगेच सिद्ध होतो.... पशूंना संस्कृत व्याकरण शिकवणे निरर्थक म्हणून पशूला त्या जीवनातून मुक्त होऊन मानव जन्म घेऊन समर्थ गुरूकडून व्याकरण शिकावे लागेल. तुम्हाला पूजा करण्याची गरज नाही. पण भक्तांचे पाप संस्कार नष्ट करण्यासाठी कुलदैवत असलेल्या माझ्या दत्ताची रोज पूजा मी करतो. मी आदिगुरू स्वरूप आहे. माझा भक्तांच्या अगदी डोळ्याच्या पापण्यादेखील रक्षा करतो. | ६. संकटमुक्त करणे हेच माझे सहज कार्य आहे. ते सर्व ऐकून आम्ही मुग्ध झालो त्यांचा निरोप घेऊन मी निघून निघालो आणि आज त्यांच्या दर्शनासाठी इथे कुरवपुरात आलो. त्यादिवशी श्रीपाद आम्हाला म्हणाले, ही आता कृष्णा नदी ओलांडून पलीकडे असलेल्या मांचल गावची ग्रामदेवता तुम्हाला आशीर्वाद देईल, तिचे आशीर्वाद घेऊन कुरवपूरला या. हे मांचल गाव 'मंत्रालय' या नावाने पुढे एका व्यक्तीच्या जीवंत समाधीमुळे प्रख्यात होणार आहे. |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| <br>राघवेंद्र स्वामींचे समाधीस्थान मंत्रालयम | <br>तुंगभद्रा नदीच्या तीरावरील मांचला मातेचे मंदिर |
| ७. बेटा शंकर, माझ्या नावाचे एक मोठे स्थान यानंतर होणार आहे. माझ्या आजोबांच्या घरी औदुंबर वृक्षाच्या छायेत माझ्या पादुकांची प्रतिष्ठापना होईल. ते दृष्य कसे असेल खात्री पटवण्यासाठी मी तुम्हाला दिव्यदृष्टी देत आहे. त्यांनी माझ्या आणि गुरूचरणांच्या भ्रूमध्य भागी दिव्य हस्त स्पर्श केला. आम्ही ते सुंदर दृश्य पाहून धन्य झालो. नंतर ते म्हणाले, 'वसिष्ठ गुरूंचा अंश असणारा या संस्थांचा पुजारी होणार'.<br>अध्याय २० समाप्त. | ।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।। |